**आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्या आस्थापनेवरील समाज कल्याण अधिकारी, गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या विनंती बदल्या...**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः सकआ - २०१७/प्र.क्र.२०६/ आस्था-२**
मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक
मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २२ ऑगस्ट, २०१७

**आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या नियम-४ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने समाज कल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवर कार्यरत असलेल्या समाज कल्याण अधिकारी, गट ब संवर्गातील खालील अधिकाऱ्यांच्या बदल्या करण्यात येत असुन, त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी व कारणास्तव त्यांची बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे :-

| **अ. क्र.** | **अधिकाऱ्यांचे नांव, पदनाम** | **सध्या कार्यरत ठिकाण** | **बदलीने पदस्थापनेचे ठिकाण व कारण** |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.हरेश्वर दत्तात्रय डोंगरे | समाज कल्याण अधिकारी, गट ब, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे | समाज कल्याण अधिकारी, गट ब, सहाय्यक आयुक्त समाज कल्याण यांचे कार्यालय, पुणे (विनंतीनुसार) |

२. श्री.हरेश्वर दत्तात्रय डोंगरे, समाज कल्याण अधिकारी, गट ब यांचेकडे सद्य:स्थितीत असलेला सहाय्यक आयुक्त समाज कल्याण, पुणे या पदाचा अतिरिक्त कार्यभार, त्यांचेकडे कायम ठेवण्यात येत आहे.

३. बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे -

१. बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर आयुक्त समाज कल्याण, पुणे यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यास बदली झालेल्या पदावर रुजु होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे.

२. बदली झालेला अधिकारी संबंधित कार्यालयातून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यावर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. एखाद्या अधिकाऱ्यास रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतीक्षा काळ ठरवून काम न देता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित आस्थापना अधिकाऱ्यांस जबाबदार धरण्यात येईल.

३. बदली आदेशात बदल करुन घेण्यासाठी संबंधित अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८२२१६४८२५८७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Amrutrao Zalte

Digitally signed by Siddharth Amrutrao Zalte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=dc54b49c6f5c903027053476b3a6ef50b46ff44a7e8b820fef7bfdd100c56194, cn=Siddharth Amrutrao Zalte
Date: 2017.08.22 16:37:44 +05'30'

**(सि. अ. झाल्टे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अधिकारी (आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्यामार्फत)

**प्रत,**

१) आयुक्त, समाज कल्याण, पुणे
२) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण
३) प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, पुणे विभाग, पुणे
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई
५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
६) मा.मंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
७) मा.राज्यमंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
८) सचिव (सा. न्या. व वि. स. विभाग) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक मंत्रालय मुंबई
९) निवडनस्ती आस्था-२